महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम, १९६७ मध्ये सुधारणा सुचविण्यासाठी सुधारणा समिती पुनर्गठीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०२२/प्र.क्र. १६१/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च,२०२३.

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं-२०१८/प्र.क्र.२१२/२०१८/साशि-५, दि.०६.०३.२०१९.
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र. १५/२०२०/साशि-५, दि.२७.०१.२०२०.
३. मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२७.०९.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
४. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३४/अधिनियम सुधारणा समिती पुर्नरचना/२०२२-२३/१०५८४,दि.०२.१२.२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण आणि शहरी भागातील जनतेला सामाजिक, आर्थिक, राजकीय, शैक्षणिक, माहिती-तंत्रज्ञान, कृषि, क्रीडा, कला व मनोरंजन इत्यादी क्षेत्रातील विविध बाबींची आणि विषयांची माहिती मिळावी यासाठी सार्वजनिक ग्रंथालयांचे महत्व ओळखून महाराष्ट्र शासनाने, महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम, १९६७ मंजूर केला आहे. या अधिनियमान्वये राज्यातील जनतेमध्ये वाचन सवयीची जोपासना करणे आणि सार्वजनिक ग्रंथालय प्रणालीचा विकास करुन राज्यातील ग्रामीण भागापर्यंत वाचन/ग्रंथालय चळवळ पोहचविण्याचे कार्य शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांमार्फत सुरु आहे. महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम, १९६७ दि.०१ मे, १९६८ रोजी संमत झाला असून त्यास ५० वर्षे झालेली आहेत. सदर अधिनियमात कालानुरुप बदल करण्याची आवश्यकता असल्याने अधिनियमात सुधारणा सुचविण्यासाठी संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णय, दिनांक ०६.०३.२०१९ अन्वये, तत्कालीन प्र. ग्रंथालय संचालक, श्री. सुभाष राठोड यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली होती. समितीचे कामकाज अंतिम टप्प्यात असताना, संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णय दि.२७.०१.२०२० अन्वये, या समितीमधील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करण्यात आल्या.

मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२७.०९.२०२२ रोजी एक्सेलसियर इमारत, फोर्ट, मुंबई येथे बैठक पार पडली. सदर बैठकीमध्ये, मा. मंत्री महोदयांनी, ग्रंथालय अधिनियम सुधारणा करण्यासंदर्भात गठित करण्यात आलेली राठोड समिती कामकाज पूर्ण होण्यापूर्वीच संपुष्टात आल्याने, आता नवीन ग्रंथालय संचालकांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करावी आणि तातडीने समितीच्या

बैठका घेऊन एका महिन्यात अहवाल प्राप्त करून घेण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार सदर अधिनियमात सुधारणा सुचविण्यासाठी समिती पुनर्गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम १९६७ मध्ये सुधारणा सुचविण्यासाठी खालील प्रमाणे सुधारणा समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सदस्य | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| | **शासकीय सदस्य** | |
| १. | श्री. दत्तात्रेय आ. क्षीरसागर, ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | डॉ. विजयकुमार जगताप, जिल्हा ग्रंथालय अधिकारी, शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी. | सदस्य |
| ३. | श्री. शशिकांत काकड, जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, मुंबई शहर. | सदस्य सचिव |
| | **अशासकीय सदस्य** | |
| ४. | श्री. भूपेंद्र गुरव, सेवानिवृत्त प्रभारी सचिव (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, ७ शिवसंकल्प हौ.सो., प्रगती कॉलनी, उपनगर, नाशिक-४२२ ००६. | सदस्य |
| ५. | श्री. डी. पी. गोमारे, निवृत्त विधी सल्लागार तथा सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, १०२, पहिला मजला, मजेठिया चेंबर, अब्दुल रझाक अलाना मार्ग, अलाना सेंटर जवळ, बुर्मा हॉटेलजवळ, फोर्ट, मुंबई-४०० ००१. | सदस्य |
| ६. | डॉ.गजानन कोटेवार, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ. | सदस्य |
| ७. | डॉ. राजशेखर शंकरराव बालेकर, ए-४, अक्षय गार्डन, देवानगरी, शाहनुरवाडी, औरंगाबाद-४३१००५. | सदस्य |
| ८. | डॉ. राजेंद्र कुंभार, प्राध्यापक, सावित्रीबाई फुले विद्यापीठ, पुणे, ५ वृंदावन पॅराडाईज, हॉटेल सदानंद रिसॉर्टच्या समोर, अंबिशन लेडीज हॉस्टेलजवळ, बाणेर, पुणे-४११००७. | सदस्य |

२. **समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-**

सदर समितीने महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम, १९६७ मध्ये कालानुरुप बदलत्या परिस्थितीनुसार अधिनियमाच्या मसुद्यामध्ये आवश्यक सुधारणा करून, सर्व समावेशक अधिनियमाचे प्रारूप तयार करावे.

सदर समिती आपल्या स्वयंस्पष्ट शिफारशींसह अधिनियमाचा सुधारित मसुदा शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत शासनास सादर करेल.

३. **समितीचे कामकाज**:-

सदर समितीचे कामकाज ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयात करण्यात येईल. ग्रंथालय संचालकांनी समितीच्या कामकाजासाठी आवश्यक व्यवस्था करावी.

४. **समितीचा कार्यकाल**:-

सदर समितीचा कार्यकाल समिती गठित केल्याच्या दिनांकापासून एक महिना राहील.

५. **बैठक भत्ता व प्रवास भत्ता**:-

समितीतील अशासकीय सदस्यांना रूपये ७,०००/- प्रति बैठक याप्रमाणे बैठक भत्ता व प्रवास भत्ता अनुज्ञेय असेल. बैठक भत्त्यापोटी होणारा खर्च लेखाशिर्ष २२०५०२५१-१३ कार्यालयीन खर्च व प्रवास भत्यापोटी होणारा खर्च ११-देशांतर्गत प्रवास खर्च या उद्दिष्टांखालील तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३१४१५२३३३७८०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by HEMANT SUDHAKAR PATHAK
Date: 2023.03.14 15:30:21 +05'30'

**(हे.सु.पाठक)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

समितीचे सर्व सदस्य ( ग्रंथालय संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१. मा. मंत्री (उ.व.तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (उ.व.तं.शि.), मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. अवर सचिव, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती,साशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.